वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर व तिच्या सात संलग्न संस्थाकरिता सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी वेतनेत्तर अनुदानाच्या ८५% मर्यादेत उर्वरीत एकूण रु.११.४९७५ लक्ष निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वनास-४०१४/प्र.क्र. २०६ /३-अे**

मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

तारीखः-२४ फेब्रुवारी,२०१५

**वाचा –**

१ शासन निर्णय क्रमांक वनास २०१४/प्र.क्र.२०६,दिनांक १९.८.२०१४.

२ शासन निर्णय क्रमांक वनास २०१४/प्र.क्र.२०६,दिनांक १२.९.२०१४.

३ वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३,दि.२.१.२०१५

४ शासन परिपत्रक क्रमांकः वित्त विभाग क्र.अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ९.२.२०१५

**प्रस्तावना–**

राज्यातील कृषि विकास कार्यक्रमाचे महत्व लक्षात घेऊन कृषि विभागातील तसेच कृषि विकासाशी संबंधित अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना अदयावत प्रशिक्षण देण्याचे उद्दीष्ट लक्षात घेऊन नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था सुरु करण्यात आली आहे. सदरहू संस्था ही राज्यातील शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली असून नागपूर,पुणे, औरंगाबाद, अमरावती,नाशिक,कोल्हापूर व खोपोली येथील ७ मृदसंधारण प्रशिक्षण संस्था या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या संलग्न कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती) म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत.

वनामती व तिच्या सात संलग्न रामेती संस्थांचे एकुण कर्मचारी / अधिकारी इ.चे वेतन, कार्यालयीन खर्च व अनुषंगिक खर्च, वाहतूक, वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती, इमारत देखभाल, प्रशिक्षण, संशोधन प्रसिद्धी इ. करीता सहाय्यक अनुदानाअंतर्गत मंजूर असलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांचे वेतनाकरिता ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) याखाली रु.६२७.१५ लक्ष व ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) याखाली रु.४५.९९ लक्ष इतकी तरतुद सन २०१४-१५ या वर्षासाठी अर्थसकल्पीत केलेली आहे.

सन २०१४-१५ साठी ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) याखाली मंजूर तरतुद रुपये ४५.९९ लक्ष एवढया रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच अर्थसंकल्पीय निधीच्या ६०% म्हणजेच एकंदरीत रु.२७.५९४ लक्ष यापूर्वीच वितरीत करण्यात आलेला आहे. प्रस्तुत निधी वजा जाता आता ८५%मर्यादेत उर्वरित २५% म्हणजेच रु११.४९७५ लक्ष इतक्या निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासननिर्णय -**

वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर व तिच्या सात संलग्न संस्थांना सन २०१४-१५ या वर्षाच्या वेतनेत्तर खर्चासाठी रुपये ११.४९७५ लाख एवढया निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यापित्यर्थ होणारा खर्च सन २०१४-१५ मध्ये मंजूर केलेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

मागणी क्रमांक - डी-३
२४०१,पीकसंवर्धन
१०९,विस्तार व प्रशिक्षण
(०१)(४६) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर व तिच्या सात संलग्न संस्थांना सहाय्यक अनुदान (योजनेत्तर)
(दत्तमत) (२४०१ ४२५८)
३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)

३. मंजुर निधी खर्च करतांना तो विहित कार्यपध्दतीस अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / टेंडर नियमावली व नियमांचे / प्रक्रियेचे अवलंबून /वित्तीय अधिकाऱ्याच्या मर्यादेत, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मॅन्युअलचे अधिन राहून / सी.व्हि.सी. च्या मार्गदर्शक तत्वानुसार/सी.ए.जी.च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णयानुसार /नियम /परिपत्रक/तरतुदीनुसार /बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

४ सदर निधीच्या आहरण व वितरणाचे अधिकार संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर यांना प्रदान करण्यात येत आहे.

५. हे आदेश वित्त विभागाने परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.५/अर्थसंकल्प-३, दिनांक ९.२.२०१५ अन्वये दिलेल्या सूचनेनुसार तसेच मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांनी दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२४११५६४७३८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Borkar Vidyadhar M

Digitally signed by Borkar Vidyadhar M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Borkar Vidyadhar M
Date: 2015.02.24 12:08:07 +05'30'

**(वि.म.बोरकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे

२ संचालक, (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३ संचालिका,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
४ सर्व संचालक/ सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५ प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,खोपोली,ता.खानापूर,जि.रायगड.
६ प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,गेट क्रमांक ४,शहाजी नगर,लाईन बाजार,कोल्हापूर,
७ प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बुलडोजर युनिट,शिवाजी नगर,पोस्ट ऑफीस जवळ, च-होली , पुणे.
८ प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,संभाजी चौक, उंटवाडी रोड, नाशिक
९ प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,.शहानुर मिया, दर्गा रोड, औरंगाबाद.
१० प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,तपोवन रोड, अमरावती,
११ प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,बंगला क्रमांक ६२/१,धरमपेठ, व्ही.आय. पी. रोड, सीव्हील लाईन, नागपूर.
१२ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती, पुणे, कोल्हापूर व खोपोली.
१३ महालेखापाल १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
१४ सर्व मा.विधानमंडळ सदस्य.
१५ वित्त विभाग (व्यय-१/अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय),मंत्रालय,मुंबई-३२
१६ कार्यासन अधिकारी, २-अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई ३२
१७ निवड नस्ती